**मौजे करवले, ता.अंबरनाथ, जि.ठाणे येथील प्रस्तावित घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पामुळे बाधित होणाऱ्या प्रकल्पग्रस्तांकरिता विशेष पुनर्वसन आराखडयास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आरपीए २०१८/प्र.क्र.१६३/भाग-१/र-३**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: २९ जानेवारी, २०१९

वाचा:- १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:- आरपीए २०१८/प्र.क्र.१६३/र-३, दि.०२.०८.२०१८
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:- आरपीए २०१८/प्र.क्र.१६३/भाग-१/र-३, दि.२२.११.२०१८

प्रस्तावना:-

दि.०२.०८.२०१८ रोजीच्या शासन निर्णयानुसार मौजे करवले, ता. अंबरनाथ, जि.ठाणे येथील शासकीय जमीनीवरील बांधकामग्रस्तांना प्रकल्पग्रस्त म्हणून घोषित केले आहे. मौजे करवले, ता. अंबरनाथ, जि. ठाणे येथील प्रस्तावित घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पासाठी बृहन्मुंबई महानगरपालिकेस अभिकर्ता यंत्रणा म्हणून दि.२२.११.२०१८ च्या शासन निर्णयाव्दारे घोषित करण्यात आले आहे. आता मौजे करवले, ता. अंबरनाथ, जि. ठाणे येथील बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पासाठी विशेष पुनर्वसन आराखडयास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

विभागीय आयुक्त कोकण विभाग यांच्या दि.११.०१.२०१९ च्या पत्रान्वये त्यांनी जिल्हाधिकारी ठाणे यांच्या दि.११.०१.२०१९ च्या पत्रानुसार प्रकल्पग्रस्तांना द्यावयाच्या पुनर्वसन विषयक लाभांकरिता विशेष पुनर्वसन आराखडा सादर केला आहे. सदर आराखडयास एक विशेष बाब म्हणून मान्यता देण्यात येत आहे. सदर प्रकल्पासाठी विशेष पुनर्वसन आराखडयासाठी परिशिष्ट १ मध्ये नमूद केलेल्या आर्थिक बाबींसाठी आर्थिक तरतूद करण्याची संपूर्ण जबाबदारी बृहन्मुंबई महानगरपालिकेने पार पाडावी. सदर विशेष पुनर्वसन आराखडा (परिशिष्ट-१) सोबत जोडले आहे.

प्रस्तुत शासन निर्णय नगर विकास विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०६१६३११७०११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prasannakumar Sadananda Thakur

Digitally signed by Prasannakumar Sadananda Thakur
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=26565a6d8174436db1bdfcb621149f27a964fce785ca930cb445005a14b2f34d, cn=Prasannakumar Sadananda Thakur
Date: 2019.02.06 16:34:56 +05'30'

(प्र.स.ठाकूर)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री, मदत व पुनर्वसन, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री, मदत व पुनर्वसन, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री, नगर विकास विभाग, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
६. अपर मुख्य सचिव (महसूल), मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन), मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
११.आयुक्त, मुंबई महानगरपालिका, मुंबई.
१२.जिल्हाधिकारी ठाणे.
१३.जिल्हा पुनर्वसन अधिकारी, ठाणे.
१४.अवर सचिव, नवि-२१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.निवड नस्ती (कार्यासन र-३).

# परिशिष्ट-१

## भूमी संपादन, पुनर्वसन व पुनर्स्थापना करताना वाजवी भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क अधिनियम २०१३ नुसार भाग-२ पुनर्वसन आणि पुनर्स्थापना अंतर्गत घटक :

| अ.क्र. | कायदयातील तरतुदी | विशेष पुनर्वसन आराखडया अंतर्गत प्रकल्पग्रस्तांना देणेच्या बाबी |
|---|---|---|
| १ | जर ग्रामीण भागात घर गमावले तर इंदिरा आवास योजनेच्या निकषानुसार बांधलेले घर किंवा त्याऐवजी घराच्या खर्चा इतकी रक्कम देण्यात यावी. | विशेष बाब म्हणुन दक्षिणेकडील स.नं.४०, ३१, व २९/१ मध्ये एकुण क्षेत्र २-९५-६७ हे.आर. पुनर्वसनासाठी उपलब्ध आहे. कायदयातील तरतुदीनुसार इंदिरा आवास योजनेच्या निकषाप्रमाणे बांधलेले २५चौरस मीटर घरास प्रकल्पग्रस्तांच्या विरोध आहे. कारण त्यांच्या सदयस्थितीतील घरांचे क्षेत्र त्याहुन अधिक असल्याने तसेच घराभोवती मोकळे क्षेत्र असुन, त्याचा वापर पशुसंपदा ठेवण्यास होत आहे. या बाबी विचारात घेऊन सदर जागेमध्ये सहाय्यक संचालक, नगर रचना ठाणे यांनी तयार केलेल्या तात्पुरत्या अभिन्यास (Layout) प्रमाणे ९० चौरस मीटर भूखंड प्रत्येक लाभार्थ्यास देणे व त्यापैकी ४५ चौरस मीटर घरांचे बांधकाम करता येणे शक्य असल्याचे कळविले आहे. त्यानुसार ७९ प्रकल्पग्रस्तांना प्रत्येकी ९० चौरस मीटरच्या भूखंड व त्यावर ४५ चौरस मीटर सिमेंट घराचे पक्के बांधकाम (R.C.C) करण्याचे विशेष बाब म्हणुन प्रस्तावित करण्यात येत आहे. |
| २ | ज्या कुटूंबात रोजगारासाठी पात्र उमेदवार असेल अशा प्रत्येक बाधित कुटूंबाला ५ लाख रुपये एकदाच दिले जातील. | कायदयातील तरतुदीप्रमाणे ज्या कुटूंबात रोजगारासाठी पात्र उमेदवार असेल अशा प्रत्येक बाधित कुटूंबाला ५ लाख रुपये प्रस्तावित करण्यात येत आहे. |
| ३ | बाधित स्थलांतरीत कुटूंबाला दरमहा रुपये ३,०००/- निर्वाह भत्ता स्थलांतराच्या तारखेपासुन एक वर्षाच्या कालावधीसाठी दिला जाईल. अनुसूचित जाती आणि अनुसूचित जमातीच्या अशा कुटूंबांना अतिरिक्त रु.५०,०००/- दिले जातील. | कायदयातील तरतुदीप्रमाणे बाधित स्थलांतरीत कुटूंबाला दरमहा रुपये ३०००/- (३००० × १२ = ३६००० ) निर्वाह भत्ता स्थलांतराच्या तारखेपासुन एक वर्षाच्या कालावधीसाठी देण्याचे प्रस्तावित करणेत येत आहे.<br>तसेच अ.ज./अ. जा. प्रत्येक कुटुंबास ५०,०००/- अतिरिक्त रक्कम प्रस्तावित करण्यात येत आहे. |
| ४ | प्रत्येक बाधित स्थलांतरीत कुटूंबाला रुपये ५०,०००/- वाहतुक खर्च दिला जाईल | कायदयातील तरतुदीप्रमाणे प्रत्येक बाधित स्थलांतरीत कुटुंबास ५०,०००/- रुपये वाहतुक खर्च प्रस्तावित करण्यात येत आहे. |

| | | |
|---|---|---|
| ५ | ज्या कुटूंबाकडे जनावरांचा गोठा किंवा छोटे दुकान होते अशा कुटूंबाला किमान रु.२५,०००/- | कायदयातील तरतुदीप्रमाणे ज्या कुटुंबांकडे जनावरांचा गोठा किंवा छोटे दुकान आहे अशा कुटूंबाला किमान २५,०००/- रुपये प्रस्तावित करण्यात येत आहे. |
| ६ | कारागीर, छोटे व्यापारी यांना एकदाच किमान रु.२५,०००/- अनुदान दिले जाईल. | कायदयातील तरतुदीप्रमाणे कारागीर, छोटे व्यापारी यांना एकदाच किमान २५,०००/- रुपये प्रस्तावित करण्यात येत आहे. |
| ७ | घर बदल्यानंतर एकदाच रु.५०,०००/- पुनर्स्थापना भत्ता दिला जाईल. | कायदयातील तरतुदीप्रमाणे प्रत्येक कुटूंबास घर बदल्यानंतर एकदाच रु.५०,०००/- पुनर्स्थापना भत्ता प्रस्तावित करणेत येत आहे. |
| ८ | ---- | उपरोक्त लाभाव्यतिरिक्त बाधित कुटूंबाला विशेष बाब म्हणुन प्रत्येक कुटूंबास विशेष अनुदान देणेबाबत बैठकीत आग्रह धरणेत आला. त्या अनुषंगाने बाधित कुटूंबातील पती पत्नी यांचे नांवे रुपये १० लाख ५ वर्षासाठी राष्ट्रीयकृत बॅकेमध्ये मुदत ठेवीच्या (Fix Deposit) स्वरुपात देणेबाबत प्रस्तावित करणेत येत आहे. |

| अ.क्र. | **भूमी संपादन, पुनर्वसन व पुनर्स्थापना करताना वाजवी भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क अधिनियम २०१३ नुसार खालीलप्रमाणे देय नागरी सुविधा** |
|---|---|
| १ | पुनर्वसाहत केलेल्या सर्व कुटूंबासाठी पुनर्वसाहत केलेल्या गावांमधील रस्ते आणि नजिकच्या पक्क्या रस्त्याला, रस्त्यांना व सुविधाकार हक्कांना जोडणारा बारमाही पक्का रस्ता |
| २ | प्रत्यक्षपणे पुनर्वसाहत करण्यापुर्वी कार्यान्वित केलेल्या योग्य जलनि:स्सारण तसेच स्वच्छताविषयक योजना |
| ३ | भारत सरकारने विहीत केलेल्या मानकांप्रमाणे<br>प्रत्येक कुटूंबासाठी स्वच्छ पेयजलाचे एक किंवा अधिक खात्रीचे स्त्रोत ( साधन) |
| ४ | पशुसाठी पिण्याच्या पाण्याची तरतुद |
| ५ | रास्त भावाचे दुकान |
| ६ | उचित असेल त्याप्रमाणे, बचत खाते उघडण्याच्या सुविधांसह ग्रामीण पातळीवरील टपाल कार्यालये |
| ७ | गरज असेल, तर त्याप्रमाणे उचित बियाणे-नि-खते साठवण सुविधा |
| ८ | विस्थापित व्यक्तीच्या पुनर्वसाहतीसाठी स्थापन केलेल्या सर्व नवीन गावांना सुयोग्य अशी परिवहन सुविधा पुरविण्यात येईल. ज्यामध्ये जवळच्या वृध्दी केंद्रांना/नागरी वसाहतीना जोडण्यासाठी स्थानिक बस सेवांच्या मार्फत पुरविल्या जाणा-या सार्वजनिक परिवहन सुविधांचा समावेश असला पाहिजे. |
| ९ | त्या जागी असलेल्या जाती समाज व त्यांच्या प्रथांवर अवलंबून राहुन, दफन भूमी किंवा दहनभूमीची तरतूद करणे |
| १० | वैयक्तिक शौचालयांसह स्वच्छतेच्या सुविधांची तरतुद करणे |

| | |
|---|---|
| ११ | प्रत्येक कुटूंबासाठी व सार्वजनिक प्रकाश योजनेसाठी वैयक्तिक एकेरी (सिंगल) वीज जोडण्या (किंवा सौर उर्जेसारख्या उर्जेच्या अपारंपारिक साधनांद्वारे) |
| १२ | बालके व माता यांना पुरक पोषण आहार सेवा पुरविणा-या अंगणवाडया |
| १३ | बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क अधिनियम २००९ (२००९ चा ३५) तरतुदीनुसार शाळा |
| १४ | बालकांसाठी खेळाचे मैदान |
| १५ | गरज असेल तर, वस्त्यांसाठी उचित सुरक्षा व्यवस्था पुरविली पाहिजे. |

| **अ.क्र.** | **आदिवासी विकास विभागाच्या केंद्रवर्ती अर्थसंकल्प (न्युक्लिअस बजेट) योजनेमधुन आदिवासी प्रकल्पग्रस्तांना प्राधान्यक्रमाने खालील योजना देण्याचे प्रस्तावित करण्यात येत आहे.** |
|---|---|
| १ | अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना बुरुडकाम व्यवसाय करण्यासाठी डी.बी.टी.द्वारे अर्थसहाय्य देणे |
| २ | अनुसूचित जमातीच्या महिला बचत गटास २ दिवसाचे प्रशिक्षण देऊन, सॅनिटरी पॅड तयार करण्याची मशीन खरेदी करण्यासाठी डी.बी.टी.द्वारे अर्थसहाय्य देणे |
| ३ | अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना बहीस्त शेळीपालन करण्यासाठी डी.बी.टी.द्वारे अर्थसहाय्य देणे |
| ४ | अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना कुक्कुटपालन करण्यासाठी डी.बी.टी.द्वारे अर्थसहाय्य देणे |
| ५ | अनुसूचित जमातीच्या मुला /मुलींना मराठी व इंग्रजी कॉम्प्युटर टायपिंगचे प्रशिक्षण देणे |
| ६ | अनुसूचित जमातीच्या मुला /मुलींना संगणक टॅलीचे प्रशिक्षण देणे |
| ७ | अनुसूचित जमातीच्या मुला /मुलींना MS CIT/CCC प्रशिक्षण देणे |
| ८ | अनुसूचित जमातीच्या विदयार्थ्याकरिता करिअर मार्गदर्शन, कौशल्य, मुलाखत तंत्र विकास व व्यक्तिमत्व विकास प्रशिक्षण देणे |
| ९ | अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना जातीचा दाखला काढण्यासाठी अर्थसहाय्य देणे |
| १० | आदिवासी पारंपारिक नृत्य/बोहडा पथकांना वेशभूषा व इतर साहित्य खरेदी करण्यासाठी डी.बी.टी.द्वारे अर्थसहाय्य देणे |
| ११ | अनुसूचित जमातीच्या महिला कला पथकांना लेझीम व ढोलताशा साहित्य खरेदी करण्यासाठी डी.बी.टी.द्वारे अर्थसहाय्य देणे |
| १२ | राष्ट्रीय /अंतरराष्ट्रीय स्तरावर आदिवासी युवक/युवतींना विविध खेळामध्ये सहभागी होण्यासाठी डी.बी.टी.द्वारे अर्थसहाय्य देणे |
| १३ | कातकरी उत्थान अभियान अंतर्गत कातकरी प्रकल्पग्रस्तांसाठी प्राधान्याने योजना राबविणे |

******************************************